**नवनिर्मित पालघर जिल्ह्यासाठी पोलीस अधिक्षक कार्यालयाकरिता पोलीस अधिक्षक, ठाणे ग्रामीण अधिनस्त कार्यालये / पोलीस ठाण्यातील कार्यकारी / अकार्यकारी पदे तसेच वाहने, शस्त्रे, दारुगोळा, साधनसामुग्री वर्ग करण्याबाबत...**

## महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन शुद्धीपत्रक क्रमांकः अेपीओ-०३१४/प्र.क्र.४७/पोल-३

मंत्रालय, जागतिक व्यापार केंद्र, सेंटर-१,
कफ परेड, मुंबई-४०० ००५.
तारीख: १४ जानेवारी २०१५

**वाचा :**

१) **शासन निर्णय, गृह विभाग क्रमांकः अेपीओ-०३१४/प्र.क्र.४७/पोल-३, दिनांक ३१ जुलै २०१४**
२) **पोलीस महासंचालक, मुंबई यांचे पत्र क्रमांक-पोमसं/२६-अ/४७/पालघर/ १६९/ २०१४, दिनांक ९ जुलै २०१४ व १९ नोव्हेंबर २०१४**

**प्रस्तावना :**

पोलीस महांसंचालक, मुंबई कार्यालयाच्या दिनांक ९ जुलै २०१४ च्या पत्रान्वये पोलीस अधिक्षक, ठाणे (ग्रामीण) कार्यालयाच्या अधिनस्त कार्यालयामधील पोलीस हवालदार संवर्गाची ४२३ पदे व प्रमुख लिपिक संवर्गाची ४ पदे नवनिर्मित पोलीस अधिक्षक, पालघर कार्यालयाकडे वर्ग करण्याची विनंती केली होती. तथापि पदे वर्ग करण्यासाठी प्रस्ताविलेल्या कार्यकारी / अकार्यकारी पदांच्या तपशीलाच्या तक्त्यामध्ये HC नमूद केले असल्यामुळे, पोलीस हवालदारांची ४२७ पदे वर्ग करण्यास दिनांक ३१ जुलै २०१४ च्या शासन निर्णयान्वये मंजुरी देण्यात आली. आता पोलीस पोलीस महासंचालकांच्या दिनांक १९ नोव्हेंबर २०१४ च्या पत्रान्वये केलेल्या विनंतीनुसार गृह विभागाच्या दिनांक ३१ जुलै २०१४ च्या शासन निर्णयात खालीलप्रमाणे सुधारणा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**शासन शुद्धीपत्रक** :

शासन निर्णय, गृह विभाग क्रमांक-अेपीओ-०३१४/प्र.क्र.१४/पोल-३, दिनांक ३१ जुलै २०१४ मधील परिच्छेद-१ (१) मधील कार्यकारी / अकार्यकारी पदांच्या तक्त्यातील अ.क्र.१४ येथील **"हेड कॉन्स्टेबल-४२७"** पदांऐवजी **"हेड कॉन्स्टेबल-४२३"** असे वाचण्यात यावे.

२. पोलीस अधिक्षक, ठाणे (ग्रामीण) कार्यालयाच्या अधिनस्त कार्यालयामधील प्रमुख लिपिक संवर्गाची ४ पदे नवनिर्मित पोलीस अधिक्षक, पालघर कार्यालयाकडे वर्ग करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर शासन शुद्धीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०११४११३४४४४२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KADAM DATTATRAY HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: CN = KADAM DATTATRAY HANMANT, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HOME DEPT,CID - 918120
Date: 2015.01.14 12:24:06 +05'30'

**द.ह.कदम**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग

प्रत,
१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) पोलीस अधिक्षक, ठाणे ग्रामीण.
३) पोलीस अधिक्षक, पालघर.
४) अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, मुंबई.
७) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे / पालघर.
९) सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०) सर्व पोलीस आयुक्त,
११) सर्व परिक्षेत्रीय विशेष पोलीस महानिरीक्षक,
१२) सर्व जिल्हा पोलीस अधिक्षक.
१३) सर्व समादेशक, राज्य राखीव पोलीस बल.
१४) गृह विभागातील सर्व सहसचिव / उपसचिव.
१५) निवड नस्ती / पोल-३.